**अध्यक्ष, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर यांना "मंत्री" पदाचा दर्जा देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एफडीसी-२०१८/प्र.क्र.१७८/फ-५,**
मादाम कामा मार्ग. हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०६ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा</u> - १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शासाउ-१०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ., दि.१३ मार्च, २०१२.
२. शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.एफडीसी-२०१६/प्र.क्र.६५/फ-५, दि.२ सप्टेंबर, २०१६.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफडीसी-२०१७/प्र.क्र.५४/फ-५, दि.१५ जून, २०१७.

**<u>प्रस्तावना</u>** :-

सन १९६९ साली वन विभागात फॉरेस्ट डेव्हलपमेंट बोर्डाची स्थापना करण्यात आली. जास्त उत्पन्न देणा-या सागवान या प्रजातीची रोपवने मोठया प्रमाणावर तयार करण्याचे उद्दिष्ट बोर्डासमोर होते. सन १९६९ ते १९७४ पर्यंत बोर्डाने केलेल्या कामाचा अनुभव व नॅशनल कमिशन ऑन ॲग्रीकल्चरने केलेली शिफारस लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाने स्वत:च्या मालकीची फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड या कंपनीची स्थापना १९७४ मध्ये केली बोर्डाने केलेली रोपवने कंपनीकडे हस्तांतरीत करण्यात आली.

महाराष्ट्र वन विकास महामंडळातील चौफेर कामाचा आवाका विचारात घेता अध्यक्ष, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित यांना सध्या असलेल्या राज्यमंत्री पदाच्या दर्जात वाढ करणे क्रमप्राप्त ठरते, त्यांच्या दर्जात वाढ केल्याने महामंडळाची जनमानसात प्रतिमा उंचावण्यास निश्चित सकारात्मक परिणाम होईल. या सर्व बाबीचा विचार करुन, महाराष्ट्र वन विकास महामंडळाचे अध्यक्ष श्री.चंदनसिंह चंदेल यांना मंत्री पदाचा दर्जा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आदेश संदर्भ क्र.२, दि.०२ सप्टेंबर, २०१६ अन्वये श्री.चंदनसिंह चंदेल, बल्लारपूर, जि.चंद्रपूर यांची महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर च्या अध्यक्ष पदावर नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच शासन निर्णय संदर्भ क्र.३, दि.१५ जून, २०१७ अन्वये त्यांना राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात आला आहे.

आता श्री.चंदनसिंह चंदेल, बल्लारपूर, जि.चंद्रपूर, अध्यक्ष, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर यांना या शासन निर्णयान्वये **"मंत्री"** पदाचा दर्जा देण्यात येत आहे.

महाराष्ट्र वन विकास महामंडळाचे अध्यक्ष यांना प्रदान करण्यात आलेल्या **"मंत्री"** पदाच्या दर्जाच्या अनुषंगाने त्यांना शासन निर्णय वित्त वित्त विभाग, क्र. शासाऊ-१०.१० /प्र.क्र.९६/ १०/सा.उ., दिनांक १३ मार्च, २०१२ प्रमाणे देय असलेल्या सोयीसुविधा अनुज्ञेय असतील.

श्री.चंदनसिंह चंदेल, बल्लारपूर, जि.चंद्रपूर, अध्यक्ष, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर यांना **“मंत्री”** पदाचा दर्जा देण्यात आल्याने, त्यांना सदर पदावर असेपर्यंत द्यावयाच्या सोयीसुविधा यावर होणारा खर्च महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर यांच्या अंतर्गत स्रोतातून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०८२९१३०७५२१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.09.07 12:58:20 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मंबई.
५. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मंबई.
६. मा.चंदनसिंह चंदेल, अध्यक्ष, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर .
७. सचिव, वन व पर्यावरण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
८. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महमंडळ, नागपूर.
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. व्यवस्थापकीय संचालक, पर्यटन विकास महमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६.मुख्य वनसरक्षक (सर्व)
१७.जिल्हाधिकारी (सर्व), महाराष्ट्र राज्य.
१८.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
१९. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर-२.
२०. मुख्य महाव्यवस्थपक/ महाव्यवस्थापक/प्रादेशिक व्यवस्थापक/ विभागीय व्यवस्थापक, एफ.डी.सी.एम.लि.(सर्व)
२१ कंपनी सचिव, एफ.डी.सी.एम.लि., नागपूर.
२२. लेखा नियंत्रक व वित्तीय सल्लागार, एफ.डी.सी.एम.लि., नागपूर.
२३. निवड नस्ती फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.